पंचायत समिती सिल्लोड (जि. औरंगाबाद) येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२२/प्र.क्र.३५/बांध - ४

५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख : २२ मार्च, २०२२

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांक :** ग्राम विकास विभाग क्र. पंसई-२०१३/प्र.क्र.१८१/पंरा-७, दिनांक २७ जुलै, २०१६.

२) **शासन निर्णय क्रमांक :** ग्राम विकास विभाग क्र. पंसई-२०२१/प्र.क्र.१७९/बांध-४, दिनांक ०५ जानेवारी, २०२२.

३) **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांकः** जाक्र/ बांध/पीबीआर-३/कावि-४९४/२०२२, दिनांक १० फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :-**

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी वाचा मधील अनुक्रमांक ३ येथील पत्रान्वये पंचायत समिती सिल्लोड (जि. औरंगाबाद) येथील प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामाच्या रु.७७.९० लक्ष किंमतीच्या कामास प्रशासकीय मान्यता दिलेला विभागाचा दि.०५ जानेवारी, २०२२ रोजीचा शासन निर्णय रद्द करून रू.१५१.५० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केलेली आहे.

**०२.** ग्राम विकास विभागाच्या उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक २७ जुलै, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती सिल्लोड (जि.औरंगाबाद) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.२२७.८५ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, ग्राम विकास विभागाच्या दिनांक ०५ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती सिल्लोड (जि. औरंगाबाद) येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरीता फर्निचर या उपकामाच्या रू.७७.९० लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. पंचायत समिती सिल्लोड (जि.औरंगाबाद) येथील नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम पुर्णत्वास आले आहे. सदर इमारतीत फक्त मिटींग हॉलसाठी ॲकोस्टीक प्रणाली, बैठक व्यवस्था (स्टेज), खुर्च्या इ. बाबी समाविष्ट करण्यात आले असून अधिकारी, पदाधिकारी यांच्या दालनात कोणतेही फर्निचर पुरविण्यात आलेले नाही. तसेच टपाल

कक्ष, अभ्यागतांसाठी वेटींग स्टेशन, अधिकारी कर्मचा-यांसाठी चेंबर, अभिलेख कक्ष, विभाग निहाय बैठक व्यवस्था इ. बाबी समाविष्ट करण्यात आल्या आहेत. तथापि, सदर इमारतीत शासकीय काम करताना अधिकारी, कर्मचारी यांना अडचणी येत आहेत. यास्तव, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी पंचायत समिती सिल्लोड (जि. औरंगाबाद) येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामाचे रू.१५१.५० लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केलेले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२१-२२ च्या दरसूचीवर आधारित असून ते कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, औरंगाबाद, अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद यांनी साक्षांकीत केलेले आहे.

**०३.** मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, सिल्लोड पंचायत समितीच्या (जि. औरंगाबाद) येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामास यापुर्वी दिलेली प्रशासकीय मान्यता रद्द करुन नव्याने रू. १५१.५० लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

ग्राम विकास विभागाच्या उक्त वाचा मधील अनुक्रमांक २ येथील दिनांक ०५ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती, सिल्लोड (जि. औरंगाबाद) येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामास दिलेली प्रशासकीय मान्यता या शासन निर्णयाद्वारे रद्द करण्यात येत आहे. पंचायत समिती, सिल्लोड (जि. औरंगाबाद) येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामाच्या एकुण रू.१,५१,५०,०००/- (रूपये एक कोटी एक्कावन्न लक्ष पन्नास हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) पंचायत समिती सिल्लोड (जि. औरंगाबाद), प्रशासकीय इमारतीकरिता शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि. ७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करून घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजीत इमारतीचे फर्निचरचे काम हे सार्वजनिक बांधकाम विभाग (कार्यकारी अभियंता, सा. बां. विभाग, औरंगाबाद) या यंत्रणेमार्फत करण्यात यावे.

३) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

५) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता यांनी नियोजन करावे.

६) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

०२. पंचायत समिती सिल्लोड (जि.औरंगाबाद) येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर या उपकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे.

| General Abstract for Furniture and Sub Work of P. S. Sillod Adm. Building, Dist. Aurangabad | | |
|---|---|---|
| **Sr.No.** | **Description of item** | **Cost In Rs.** |
| A | Essential Items | |
| a | Building proper Furniture Seating Arrangement | 9999786.00 |
| | **Sub Total (a)** | **9999786.00** |
| 1 | Electrification | |
| | Internal (5% of a) | 499989.00 |
| | External (6% of a) | 599987.00 |
| | **Sub Total (1)** | **1099976.00** |
| 2 | Fire Fighting (2% of a) | 199996.00 |
| 3 | Air Conditioning | 400000.00 |
| 4 | CCTV | 100000.00 |
| | **Sub Total P (a+1+2+3+4)** | **11799758.00** |
| B | PROVISIONS | |
| 1. | Contigencies (4% of a) | 399991.00 |
| 2. | Add 12 % for GST | 1415971.00 |
| 3. | Price Escalation (10% of P ) | 1179976.00 |
| 4. | ADD 0.50 % Labour Insurance | 58999.00 |
| 5. | Architectural Consultancy (2.5% of P ) | 294994.00 |
| | **Sub Total B (1 to 5)** | **3349931.00** |
| | **Total Cost Of Project (P+B)** | **15149689.00** |
| | **Says Rs.** | **1,51,50,000/-** |

०३. उपरोक्त फर्निचर या उपकामांसाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या- टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी शासनाकडून त्या-त्या वर्षात उपलब्ध होणारा निधी संबधित वर्षात सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यकारी अभियंता, सां. बा. विभाग, औरंगाबाद यांच्याकडे वर्ग करण्याची दक्षता घ्यावी. यावरील खर्च "२५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने - (२५१५ ००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**०४.** प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ. क्र. १ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२११४५६१९३५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2022.03.22 15:15:52 +05'30'

**(प्रविण जैन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
४) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
६) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) अतिरिक्त मुख्य सचिव, (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
१०) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
११) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद.
१३) कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा औरंगाबाद.
१५) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१६) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
१७) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, औरंगाबाद.
१८) सभापती, पंचायत समिती, सिल्लोड, जि. औरंगाबाद
१९) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सिल्लोड, जि. औरंगाबाद.
२०) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.